विनंती बदली (२०२१),
**महाराष्ट्र वैद्यकीय व विमा सेवा संवर्गातील वैद्यकीय अधिकारी, गट-अ व विशेषज्ञ गट-अ..**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- राकावि-२०२१/प्र.क्र.१३७ (अ)/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, ८ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक: :- ०३ जानेवारी, २०२२.

**वाचा:-** सार्वजनिक आरोग्य विभाग शासन आदेश क्र. राकावि-२०२१/प्र.क्र.१३७/सेवा-१, दि.०९.०८.२०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४ (४) व ४(५) अन्वये राज्य कामगार विमा योजनोतील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा संवर्गातील वैद्यकीय अधिकारी, गट-अ व विशेषज्ञ, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची पुढे दर्शविल्याप्रमाणे विनंती बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र. | **अधिकाऱ्याचे नाव** | सध्याची पदस्थापना | **बदलीचा प्रकार** | बदलीने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ.प्रिती मनोहरराव कराळे | वै.प्र.अ.नागपूर अंतर्गत सेवा दवाखाना बुट्टीबोरी क्र.२ | विनंती | वै.प्र.अ.अंतर्गत सेवा दवाखाना अकोला |
| २ | डा.रमेश सु.वाढीले | रा.का.वि.यो.रुग्णालय, वरळी | विनंती | रा.का.वि.यो. रुग्णालय, मुलुंड |
| ३ | डॉ.पल्लवी पंथाकी | रा.का.वि.यो. रुग्णालय, मुलुंड | विनंती | रा.का.वि.यो. रुग्णालय, वरळी |
| ४ | डॉ.विवेक शं.भोसले | रा.का.वि.यो. रुग्णा.औरंगाबाद | विनंती | रा.का.वि.यो.सेवा दवाखाना क्र.२ औरंगाबाद |
| ५ | डॉ.फिरोजखान पठाण | रा.का.वि.यो.सेवा दवाखाना क्र.२ औरंगाबाद | विनंती | रा.का.वि.यो. रुग्णालय औरंगाबाद |
| ६ | डॉ.जयश्री जावडेकर | वै.प्र.अ.पुणे अंतर्गत सेवा दवाखाना इचलकरंजी | विनंती | वै.प्र.अ. पुणे अंतर्गत सेवा दवाखाना मिरज |
| ७ | डॉ.सं.मा.गायकवाड | रा.का.वि.यो.रुग्णालय, कांदिवली | विनंती | आयुक्त कार्यालय, लोअर परेल |
| ८ | डॉ.दिपक जाधव | रा.का.वि.यो.रुग्णालय, कांदिवली | विनंती | वै.प्र.अ.पुणे अंतर्गत सेवा दवाखाना धुळे |
| ९ | डॉ.एस.एस. मेरानी | रा.का.वि.यो. रुग्णालय,वाशी | विनंती | रा.का.वि.यो. रुग्णालय,मुलुंड |

२. वाचा येथील दि.०९.०८.२०२१ रोजीच्या शासन आदेशान्वये निर्गमित करण्यात आलेल्या बदली आदेशातील खालील नमूद अधिकाऱ्यांचे बदली आदेश रद्द करण्यात येत असून ते त्यांच्या मुळच्या ठिकाणी कार्यरत राहतील.

| अ.क्र. | **अधिकाऱ्याचे नाव** | सध्याची पदस्थापना | **दि.०९.०८.२०२१ अन्वये बदलीचे ठिकाण** | **शेरा** |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ.एस.वाय. भागवत | वै.प्र.अ.रा.का.वि. यो. पुणे कार्यालय | रा.का.वि.योजना रुग्णालय, मोहननगर पुणे | बदली आदेश रद्द करण्यात येत आहेत. |

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे व बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर व्हावे. बदली झालेले अधिकारी हे रूजू/कार्यमुक्त झाल्याबाबतचा अनुपालन अहवाल, त्यांना रुजू करुन घेतलेल्या /कार्यमुक्त केलेल्या अधिकाऱ्याने तात्काळ आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांना सादर करावा व आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांनी शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांची कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करण्याऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, त्यांनी नवीन पदस्थापनेवर रूजू व्हावे. जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्याची अनुपस्थिती "अनधिकृत अनुपस्थिती" म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव सर्व संबंधितांना करून देण्यात येत आहे.

६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांनी जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर होणार नाहीत त्यांचे विरूध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरू करावी, जेणेकरून अधिकारी नवीन पदस्थापनेवर त्वरीत हजर होतील.

७. विनंतीने बदली झालेली असल्याने पदग्रहण अवधी/प्रवासभत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१३१०५९१३३८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2022.01.05 12:37:31 +05'30'

(अ.मा.आत्राम)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.

२. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. संचालक (प्रशासन/वैद्यकीय ), राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
४. संबंधित सर्व वैद्यकीय अधिक्षक, राज्य कामगार विमा योजना रूग्णालय.
५. संबंधित सर्व वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/पुणे/ठाणे/नाशिक/नागपूर औरंगाबाद
९. संबंधित वैद्यकीय अधिकारी (आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचे मार्फत
१०. सर्व विशेषज्ञ अधिकारी (आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई यांचेमार्फत)
११. निवडनस्ती (सेवा-१)